**महाराष्ट्र पशुसंवर्धन सेवा (गट-अ) वेतनश्रेणी रु.१५६००-३९१००, ग्रेड पे ५७०० मधील सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन या पदावर (सरळ सेवा भरती) नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्र: पसंप्र-३२१४/प्र.क्र.१०८/पदुम-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ३० ऑगस्ट, २०१८.

**वाचा:-** १. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१८६(१)(२)(४३)/१७८१/पंधरा-अ, दि.२६/७/२०१२,
२.शासन आदेश क्र. पसंप्र-२०१२/प्र.क्र.३९५/पदुम-१, दि.२७ सप्टेंबर-२०१२,

**प्रस्तावना :-**

सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन या संवर्गातील सरळ सेवेच्या कोटयातील रिक्त पदे नामनिर्देशनाने भरण्यासंदर्भात शासन पत्र दि.६/९/२००६ अन्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगास मागणी पत्र पाठविण्यात आले होते. सदर मागणी पत्रास अनुलक्षून आयोगाने त्यांच्या दि.१६ जुलै-२०१० व दि. २६ जुलै २०१२ च्या पत्रान्वये एकूण १५२ उमेदवारांची सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन (गट-अ) या पदावर नियुक्तीकरिता शासनाकडे शिफारस केली होती. त्यास अनुलक्षून शिफारस पात्र उमेदवारांना शासन आदेश दि. ०६/५/२०११, दि.३१/५/२०१२, दि.२७/९/२०१२, दि. ०९/१/२०१३ व दि. ०४/७/२०१३ अन्वये सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन (गट-अ) या पदावर पदस्थापना देण्यात आली आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या दिनांक २६/७/२०१२ च्या पत्रान्वये सादर केलेल्या शिफारस पत्रामध्ये डॉ. अस्मिता वसंतराव तडसकर,पशुधन विकास अधिकारी (गुणवत्ता क्र.३९) यांची सरळसेवेने सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन या पदावर नियुक्ती करिता शिफारस केली होती. तथापि त्यावेळी डॉ. तडसकर यांना लाचलुचपत प्रतिबंधक प्रकरणामध्ये निलंबित केले असल्याने तसेच त्यांच्या विरुध्द न्यायालयात अभियोग दाखल केला असल्याने त्याच प्रमाणे त्यांचे विरुध्द विभागीय चौकशी आदेशित केली असल्याने डॉ. तडसकर यांना सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन गट - अ या पदावर नियुक्तीचे आदेश देण्यात आले नव्हते.

दरम्यान डॉ. अस्मिता तडसकर यांचे विरुध्दच्या लाचलुचपत प्रतिबंधक प्रकरणामध्ये अतिरिक्त सत्र न्यायालय वर्धा येथे न्यायप्रविष्ठ असलेले प्रकरण क्र.४/२०१२ मध्ये मा. न्यायालयाने त्यांच्या दि. १९/१०/२०१५ च्या आदेशान्वये डॉ. तडसकर यांना दोष मुक्त ठरविले आहे. तसेच सदर निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालयात अपिल न करण्याचा निर्णय लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने घेतला आहे. त्याप्रमाणे डॉ. तडसकर यांचे विरुध्द च्या विभागीय चौकशी प्रकरणी शासन आदेश दि. १५/१/२०१८ अन्वये त्यांना दोष मुक्त करण्यात आले आहे. सद्यस्थितीत डॉ. तडसकर यांचे विरुध्द कोणतेही न्यायालयीन प्रकरण अथवा विभागीय चौकशी प्रलंबित नसल्याने डॉ. अस्मिता तडसकर पशुधन विकास अधिकारी यांना सहायक आयुक्त पशुसंवर्धन या पदावर नियुक्ती देणे आवश्यक आहे.

**शासन आदेश :-**

वरील वस्तुस्थिती विचारात घेता डॉ. अस्मिता तडसकर यांची पशुसंवर्धन विभागात सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र पशुसंवर्धन सेवा (गट-अ) (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ५७००) या पदावर महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण अटी व शर्ती) नियम-१९७९ मधील नियम ९ (४२) मध्ये विहित

केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे. सदर नियुक्ती ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची जाहिरात क्र. १०१/२००९ च्या अनुषंगाने विविध न्यायालयात प्रलंबित प्रकरणाच्या अनुषंगाने मा. न्यायालयाच्या/न्यायाधिकरणाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून करण्यात येत आहे.

१. तसेच डॉ. तडसकर यांची सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन (गट - अ) या पदावर खालील विवरणपत्रांतील स्तंभ क्र. ६ येथे नमूद पदावर नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | अधिका-याचे नाव | प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| १ | ३९ | डॉ. अस्मिता वसंतराव तडसकर | खुला | नागपूर विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, अतिशित गोठीत रेत प्रयोगशाळा नागपूर (रिक्त पदावर) |

२. डॉ. अस्मिता तडसकर यांचा परिविक्षा कालावधी २ वर्षांचा राहील. त्यांची पहिली वेतनवाढ त्यांचा १ वर्षाचा परिविक्षा कालावधी पूर्ण झाल्यानंतर व त्यानंतरची वेतनवाढ त्यांनी परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर देण्यात येईल.

३. डॉ. अस्मिता तडसकर यांचा सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र पशुसंवर्धन सेवा गट-अ मधील नियुक्ती ही २ वर्षांचा परिविक्षाधीन काळ समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील विहित शर्तींच्या अधीन असेल.

१. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-नागपूर यांच्या दि. ०६/१/२०१७ च्या आदेशानुसार उपरोक्त नियुक्त अधिका-यांची सेवाजेष्ठता ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांचे पत्र क्र. १८६(१)(२)(४३)/१७५१/पंधरा-अ, दि.१७ जून, २०१७ नुसार सादर केलेल्या निवड यादीतील त्यांच्या गुणानुक्रमानुसार राहील. मात्र सदर उमेदवार हे त्यांच्या मागील काळातील पगार व भत्ते मिळण्यासाठी पात्र असणार नाहीत.
२. डॉ. अस्मिता तडसकर त्याच्या नियुक्तीच्या पदावर नियुक्तीच्या आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्याच्या आत रुजू व्हावयाचे आहे. काही अपरिहार्य कारणास्तव त्यांना रुजू होण्यास मुदतवाढ हवी असल्यास तशी मुदतवाढ घेणे आवश्यक आहे. अन्यथा, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणानुक्रमानुसार त्यांना ज्येष्ठता मिळणार नाही व ते हजर होतील त्या दिनांकापासून त्याची ज्येष्ठता धरण्यात येईल
३. डॉ. अस्मिता तडसकर यांची मागील ०५ वर्षातील वास्तव्य कालावधी संदर्भातील चारित्र्य व पुर्वचारित्र्य पडताळणी आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-०७ यांचे मार्फत करण्याच्या अटींच्या अधिन राहून त्यांना तात्पुरती पदस्थापना देण्यात येत आहे. डॉ. तडसकर यांनी संबंधित पोलीस यंत्रणेकडून चारित्र्य

पडताळणीबाबतचे अहवाल प्राप्त झाल्यानंतर चारित्र्य व पुर्वचारित्र्य पडताळणी अहवाल असमाधानकारक असतील तर त्यांची नेमणुक ०१ महिन्याची नोटीस देऊन संपुष्टात आणण्यात येईल.

४. डॉ. अस्मिता तडसकर यांनी सेवा प्रवेश नियमानुसार विभागामार्फत आयोजित केल्या जाणाऱ्या विभागीय परीक्षा, प्रादेशिक भाषा परीक्षा, संगणक परीक्षा विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येणारी विभागीय लेखा परीक्षा तसेच विभागाअंतर्गत वेळोवेळी विहीत नियमानुसार आयोजित करण्यात येणाऱ्या इतर परीक्षा परिविक्षा कालावधीच्या ०२ वर्षाच्या विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

५. तसेच परिविक्षाधीन कालावधीत कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहीत विभागीय लेखा परीक्षा परिविक्षा कालावधीत उत्तीर्ण न केल्यास अथवा त्याची वर्तणुक अयोग्य, संशयास्पद आढळल्यास कोणतीही पूर्वसूचना न देता सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील.

६. डॉ. अस्मिता तडसकर या सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असेल त्यांनी शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.एन आर व्ही १०७७/१२ दि.२०.५.१९७७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान ०१ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस देणे आवश्यक राहील. तसेच शासनास त्यांची सेवा समाप्त करावयाची असेल त्यावेळी अशी एक महिन्याची आगाऊ नोटीस दिली जाईल. मात्र गैरशिस्त, सेवानियमाचा भंग इ. कारणासाठी सेवा समाप्त करतांना नोटीस देण्याचे शासनास बंधन राहणार नाही. हे नोटीशीचे नियम या नंतर वेळोवेळी होणाऱ्या नियमांतील बदलाच्या अधिन राहतील.

७. शासन निर्णय वित्त विभाग क्र.अनियो-१००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ मधील तरतूदीनुसार दि.०१ नोव्हेंबर,२००५ रोजी किंवा त्यानंतर ज्या अधिकारी/कर्मचारी यांची शासकीय सेवेत नियुक्ती होते त्यांना नविन परिभाषीत अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल. सध्या अस्तित्वात असलेली निवृत्ती वेतन योजना (म्हणजेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ आणि सध्या अस्तित्वात असलेली सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरणार नाही. मात्र उपरोक्त उमेदवारांपैकी जे शासकीय कर्मचारी ०१ नोव्हेंबर २००५ पुर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील त्यांना शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अनियो-१००६/८७/सेवा-४, दि. १२.१.२००७ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पुर्ततेच्या अधिन राहून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहतील.

८. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, गट-अ या संवर्गात शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांपैकी जे उमेदवार शासन सेवेत आहेत अशा उमेदवारांचे गोपनीय अभिलेख नियुक्ती पूर्वी तपासण्याबाबत आयोगाने दिलेल्या सूचनेच्या अनुषंगाने शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांनी त्यांचे गोपनिय अहवाल १ महिन्याच्या आत आयुक्त, पशुसंवर्धन यांचेकडे जमा करावे. सदर गोपनीय अहवालाच्या तपासनीच्या अधिन राहून डॉ. अस्मिता तडसकर यांना नियुक्ती देण्यात येत आहे.

९. डॉ. अस्मिता तडसकर यांनी खालील मूळ प्रमाणपत्रांची तपासणी आयुक्त पशुसंवर्धन, म.रा.पुणे यांनी तपासणी करावी व सदर कागदपत्रे संपूर्णपणे समाधानकारक असल्याची खातरजमा झाल्यानंतरच संबंधित त्यांना हजर करुन घेण्याबाबतचे निर्देश संबंधित कार्यालय प्रमुखांना देण्यात यावेत व त्यानंतरच संबंधित कार्यालय प्रमुखांनी उमेदवारांना रुजू करुन घ्यावे. त्यासाठी संबंधित सर्व

उमेदवारांनी त्यांच्याकडील मूळ प्रमाणपत्रासह आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-७ या कार्यालयाशी संपर्क साधावा.

१. जात वैधता प्रमाणपत्र.
२. नॉन क्रिमिलेअर प्रमाणपत्र (लागू असल्यास)
३. वैद्यकीय पात्रता प्रमाणपत्र.
४. शाळा सोडल्याचा दाखला.
५. एस.एस.सी.प्रमाणपत्र.
६. एच.एच.सी.प्रमाणपत्र.
७. बी.व्ही.एससी प्रमाणपत्र/एमव्हीएससी प्रमाणपत्र.

१०. डॉ.अस्मिता तडसकर ज्या दिवशी सेवेत हजर होतील त्यांचे बाबतचा अहवाल आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-६७ यांनी शासनास तात्काळ सादर करावा.

११. डॉ. तडसकर या ज्या दिवशी झाल्यानंतर त्या दिनांकापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहीण्यात येतील व बदली झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांकडे पाठविण्यात यावेत.

४. डॉ. तडसकर यांची नियुक्ती ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिलेली जाहीरात क्र.१०१/२००९ व त्यानुषंगाने महाराष्ट्र लोकसेवा आयेगाचे पत्र क्र.१८६(१)(२)(४३)/१७८१/पंधरा-अ, दि.२६/७/२०१२ व पत्र क्र. १८६(१)(२)(४३)/१७५१/पंधरा-अ, दि.१७ जून, २०१७ च्या अनुषंगाने विविध न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या याचिकांच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहेत. मा.न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार त्यांची नियुक्ती सुरु ठेवणे अथवा गुणवत्ता क्रमांकामध्ये बदल होण्याच्या अधीन सदर नियुक्त्या सदर नियुक्ती करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०९०११००३१५७२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Kiran V Kurundkar

Digitally signed by Kiran V Kurundkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f89b7a82db2238fb7337a9a9b8e00b9c1a35b509d1f6850ddcc783bdb12090f, cn=Kiran V Kurundkar
Date: 2018.09.01 10:11:38 +05'30'

**( किरण कुरुंदकर )**
सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
३. मा.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्रासह)
४. पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे. (०५ प्रतीसह)
५. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर
६. सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय) पुणे.
७. सर्व प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त.
८. सहआयुक्त पशुसंवर्धन, पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था, औध,पुणे.

९. सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, पुणे.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास महामंडळ, अकोला.
११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद.
१२. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त
१३. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद,
१४. महालेखापाल/महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा परीक्षा)मुंबई/ नागपूर
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६. संबंधित अधिकारी मार्फत आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,पुणे -६७
१७. निवड नस्ती (पदुम-१).